राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांच्या जागेचे थकीत भाडे व नगरपालिका कर अदा करण्यासाठी निधी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :- पुमाप-२०२३/प्र.क्र.२२०/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/पुरवणी मागणी/२०२३-२४/का-५/३८३६, दि. ३०.१०.२०२३,२९.०१.२०२४ व दि.२६.२.२०२४

**प्रस्तावना :-**

शिक्षण संस्थेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी सन १९४८-४९ मध्ये राष्ट्रीय छात्रसेना दलाची देशव्यापी स्वरुपात स्थापना करण्यात आली असून राष्ट्रीय छात्रसेनेची तरतूद व रचना करण्याच्या दृष्टीने "राष्ट्रीय छात्रसेना कायदा-१९४८" अधिनियम करण्यात आला आहे. राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्र सेनेचे प्रशिक्षण/शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येत असतात. राष्ट्रीय छात्र सेना कार्यालये काही ठिकाणी शासकीय जागेवर तर १९ ठिकाणी भाडेतत्वावर कार्यरत आहेत. सदर जागा/प्लॉट मालकाने वेळोवळी भाडयाच्या रकमेमध्ये वाढ केलेली असून सदर कार्यालयाचे भाडे व महानगरपालिका/नगरपालिकांचे कर अदा करणे प्रलंबित आहे. सदर थकीत भाडे व कर अदा करण्याकरिता निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : -

राज्यात राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्र सेनेचे प्रशिक्षण/ शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येत असतात. राष्ट्रीय छात्र सेनेच्या शासकीय जागेवर असणाऱ्या कार्यालयांचे थकीत कर व भाडेतत्वावर कार्यरत असलेल्या १९ कार्यालयांच्या भाडयाच्या रकमेत वाढ झाल्यामुळे सदर थकीत वाढीव रक्कम अदा करण्यासाठी रु.२०८.८५ लक्ष इतका निधी पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झाला आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) (०१) राष्ट्रीय छात्र सेना (अनिवार्य) १४ भाडेपट्टी व कर या लेखाशीर्षाखाली रु.८०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यामधून रु.७२ लक्ष इतका निधी वित्त विभागाने वितरीत केला आहे. पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला रु.२०८.८५ लक्ष व अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी शिल्लक रु ८ लक्ष (रु ८०-७२ लक्ष) अशा एकूण रु.२,१६,८५,०००/- पैकी सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.२,१३,८३,३७१/- (अक्षरी रूपये दोन कोटी, तेरा लक्ष त्र्यांएंशी हजार तीनशे एकाहत्तर फक्त) इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) (०१) राष्ट्रीय छात्र सेना (अनिवार्य) १४, (भाडेपट्टी व कर) सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर (२२०४ ००१६) या लेखाशीर्षामध्ये सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पिय तरतुदीद्वारे व पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेल्या निधीतून भागविण्यात यावा. उक्त रक्कम कोषागारातून आहरित करणेकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबंधित समादेशक अधिकारी, गट मुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९१/२०२४/व्यय-५, दि.१४ /०२/२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०६१५४२५७३५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.06 15:52:28 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा ) महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी ,मुंबई
६. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य ( संचालनालयामार्फत )
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/नाशिक/कोल्हापूर/सातारा/सिंधुदुर्ग/औरंगाबाद/धुळे/जळगाव/ नांदेड/अहमदनगर/नागपूर/वर्धा
९. संबंधित समादेशक अधिकारी,एन.एन.सी युनिट/बटालियन/मुख्यालय
१०. अवर सचिव (व्यय-५/विनियम/अर्थसंकल्प-८)वित्त विभाग-, मंत्रालय, मुंबई
११. अवर सचिव ( अर्थसंकल्प ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती, क्रीयुसे-३

शासन निर्णय क्र :- पुमाप-२०२३/प्र.क्र.२२०/क्रीयुसे-३ सोबतचे परिशिष्ट "अ"

# ANNEXURE- A

| Sr. No | Name of Headquarter | Name of Unit | Amount ( In Rs.) |
|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 |
| 1 | Pune | 38 MAH Bn NCC Solapur | 5,92,930/- |
| 2 | Mumbai-B | 7 MAH Bn NCC Nashik | 17,99,844/- |
| 3 | Kolhapur | NCC Gp HQ Kolhapur | 10,23,899/- |
| 4 | | 22 MAH Bn Satara | 8,08,783/- |
| 5 | | 58 MAH Bn Sindhudurgh | 4,50,099/- |
| 6 | | 19 MAH Bn NCC Karad | 30,33,144/- |
| 7 | Aurangabad | Gp Hq Aurangabad | 22,39,618/- |
| 8 | | 48 MAH Bn NCC Dhule | 9,72,686/- |
| 9 | | 49 MAH Bn NCC Amalner | 2,07,401/- |
| 10 | | 50 MAH Bn NCC Aurangabad | 17,25,482/- |
| 11 | | 51 MAH Bn NCC Aurangabad | 18,38,864/- |
| 12 | | 52 MAH Bn NCC Nanded | 15,69,845/- |
| 13 | | 57 MAH Bn NCC Ahmednagar | 45,16,650/- |
| 14 | Nagpur | NCC Gp HQ Nagpur | 3,56,118/- |
| 15 | | 21 MAH Bn Wardha | 99,750/- |
| 16 | | 2 MAH Armed Nagpur | 1,48,258/- |
| | | Total | 2,13,83,371/- |

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.06 15:53:20 +05'30'

(Shaila B.Yadav)

Under Secretary to Government of Maharashtra